सेवाविषयक बाबीसंबंधीची प्रकरणे मा.मुख्यमंत्री यांना सादर करणे व सामान्य प्रशासन विभागास दाखवणे आवश्यक असणाऱ्या प्रकरणांची यादी.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही २०१७/प्र.क्र.७६/कार्या.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०४.०३.२०१७

वाचा :-

१) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-१०७५/दहा, दिनांक २४.०७.१९७५**
२) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२००५/प्र.क्र.५/०५/१२, दिनांक २६.०६.२००६**

**शासन परिपत्रक:-**

शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरओबी-१०८६/६७/१८(ओ ॲन्ड एम) , दिनांक २४ जानेवारी, १९८७ नुसार अखिल भारतीय सेवांचे अधिकारी, विभागांच्या विभाग प्रमुख किंवा प्रदेश प्रमुख यांच्या दर्जाचे व त्या दर्जावरचे अधिकारी, विविध महामंडळाचे व्यवस्थापन संचालक आणि कमीत कमी रु.१५०० आणि त्याहून अधिक वेतनप्रमाणात वेतन घेणाऱ्या वर्ग-१ च्या अधिकाऱ्यांविरुध्द कोणतीही शिस्तभंगाची कार्यवाही करण्याचा प्रस्ताव मा.मुख्यमंत्री यांच्याकडे सादर करणे आवश्यक आहे, अशी महाराष्ट्र शासन कार्यनियमावली व त्याखाली काढण्यात आलेले अनुदेश यामध्ये सुधारित तरतूद करण्यात आलेली आहे.

२. त्याचप्रमाणे सेवाविषयक बाबीसंबंधी शासनाचे आदेश प्राप्त करण्यापूर्वी, सामान्य प्रशासन विभागाचे अभिप्राय मिळविणे आवश्यक असलेली प्रकरणे संदर्भाधिन शासन परिपत्रक दिनांक २६.०६.२००६ सोबतच्या विवरणपत्र “ब” मध्ये नमूद केलेली आहेत. या विवरणपत्र “ब” मध्ये अ.क्र.६ व ७ येथे शिस्तभंगविषयक प्रकरणांसंदर्भात खालीलप्रमाणे तरतूद आहे :-

अ.क्र. ६- “ गट “अ” मधील अधिकाऱ्यांविरुध्दची शिस्तभंगविषयक प्रकरणे (शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु करतांना तसेच शिक्षेचे प्रस्ताव अंतिम करतांना अशा दोन्ही वेळेस) ”

अ.क्र. ७- “ राजपत्रित गट “ब ” अधिकाऱ्यांच्या ज्या शिस्तभंगविषयक प्रकरणात जबरी शिक्षा प्रस्तावित आहे अशी प्रकरणे (अंतिम टप्प्यात)”

३. महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीच्या अनुदेश १५(१)(आठ)(ड) मध्ये नमूद केलेले वर्ग १ च्या अधिकाऱ्यांचे कमीत कमी रु.१५००/-हे वेतन तिसऱ्या वेतन आयोगानूसार असून सद्य:स्थितीत ६ व्या वेतन आयोगानूसार या कमीत कमी वेतनाशी समतुल्य वेतनश्रेणी रु.१५,६००-३९,१०० /- ( ग्रेड पे.७,६००) गट-अ अशी सुधारीत झाली आहे. सदर बाब लक्षात घेता, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.२६.६.२००६ सोबतच्या विवरणपत्र " ब " मधील अ.क्र.६ व ७ येथिल तरतूदी ऐवजी पुढीलप्रमाणे तरतूद विहित करण्यात येत आहे :-

**" राज्यसेवेतील गट-अ संवर्गातील (वेतनश्रेणी पी.बी.- ३ रु.१५,६००-३९,१००/- (ग्रेड पे रु.७,६००/-) (पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे रुपये १२,०००/- वेतनश्रेणी हा किमान टप्पा असलेल्या ) व त्यावरील अधिकाऱ्यांविरुध्दची शिस्तभंगविषयक प्रकरणे (शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु करतांना तसेच शिक्षेचा प्रस्ताव अंतिम करतांना अशा दोन्ही वेळेस ) "**

वरील सुधारित तरतूद विचारात घेवून यापुढे विभागीय चौकशीची प्रकरणे सामान्य प्रशासन विभागाकडे सादर करावीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१२२९१९९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2017.03.04 12:30:09 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
उपसचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई
५. सर्व मा. संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
६. मा.मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग,
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई-३२ (१० प्रती)

१०.बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव,महाराष्ट्र राज्य, बी.एस.पी.भवन, प्लॉट नं.८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-७४ (५ प्रती)

११.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२० (५ प्रती)

१२.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४ ( ५ प्रती)

१३.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३ ( ५ प्रती)

१४.इंडियन काँग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५ ( ५ प्रती)

१५.नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईट, मुंबई-२१ (५ प्रती)

१६.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८ (५ प्रती)

१७.महाराष्ट्र नवनिर्माण सेना, कृष्णकुंज, एम.बी.राऊत रोड, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८ (५प्रती)

१८.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

निवडनस्ती.